**अपंगांसाठी सर्व जिल्ह्यांमध्ये अपंगार्थ विशेष रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रांची स्थापना करण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
शासन निर्णय क्र.रोस्वरो-२००४/प्र.क्र.४१/रोस्वरो-१
नवीन प्रशासन इमारत,१४वा मजला,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २९ जुलै, २००४.

संदर्भ : शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, क्रमांक रोस्वरो-२००४/प्र.क्र.४१/ रोस्वरो-१, दिनांक १७ जुलै, २००४.

**प्रस्तावना :-**

अपंग व्यक्ति (समान संधी, हक्काचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम हा फेब्रुवारी-१९९५ पासून अंमलात आलेला आहे. श्री.भानुदास एस..वाडेकर व इतर यांनी महाराष्ट्र शासनाच्या विरुध्द ४९१७/२००३ या क्रमांकाची याचिका औरंगाबाद येथील उच्च न्यायालयाच्या खंडपीठासमोर दाखल केली. या याचिकेच्या संदर्भात दिनांक २० जुलै, २००४ रोजी झालेल्या सुनावणीच्यावेळी मा.उच्च न्यायालयाने अपंग व्यक्ति ( (समान संधी, हक्काचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५नुसार प्रत्येक जिल्हयात अपंगांसाठी विशेष रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन कार्यालये सुरु करुन त्याबाबत व्यापक प्रसिध्दी द्यावी असे आदेश दिले आहेत.

**शासन निर्णय :-**

१. मुंबई शहर व मुंबई उपनगर या दोन्ही जिल्ह्यांसाठी अपंगार्थ विशेष रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र अशा स्वतंत्र कार्यालयाची स्थापना यापूर्वीच करण्यात आली असून सदर कार्यालय मागील अनेक वर्षांपासून कार्यरत आहे.

२. अपंगांसाठी जिल्हास्तरावर विशेष रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन कक्षाची स्थापना करण्याबाबत उपरोक्त दिनांक १७ जुलै, २००४ च्या शासन निर्णयाव्दारे निर्गमित केलेले आदेश अधिक्रमीत करण्यात येत असून मा. उच्च न्यायालयाने (औरंगाबाद खंडपीठ) श्री. भानुदास एस. वाडेकर व इतर यांनी मा.उच्च न्यायालयात दाखल केलेल्या याचिका क्रमांक ४९१७/२००३ च्या संदर्भात दिनांक २० जुलै, २००४ रोजी झालेल्या सुनावणीच्या वेळी दिलेल्या आदेशानुसार राज्यातील मुंबई शहर व मुंबई उपनगर हे दोन्ही जिल्हे वगळता उर्वरित सर्व ३३ जिल्ह्यांमध्ये नवीन अपंगार्थ विशेष रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रांची स्थापना करण्यास शासन मंजूरी देत आहे. सदर केंद्रे कार्यरत होण्याच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-

अ) प्रत्येक जिल्ह्यात अपंगार्थ विशेष रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र स्थापन करण्यात यावे. सदर कार्यालयासाठी सध्या जेथे जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र कार्यरत आहे त्या कार्यालयातच स्वतंत्र जागा उपलब्ध करुन देण्यात यावी व नवीन कार्यालयाच्या नांवे सर्वांना दिसेल असा योग्य त्या आकाराचा नाम फलक लावण्यात यावा व अपंगांना नांव नोंदणीच्या संदर्भात तसेच त्यांना व्यवसाय मार्गदर्शन, रोजगार व स्वयंरोजगार इत्यादीबाबतची माहिती सर्वप्राथम्याने देण्यात यावी.

ब) अपंगार्थ विशेष रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रासाठी आवश्यक तो अधिकारी व कर्मचारीवृंद तात्काळ उपलब्ध करुन देण्यात यावा. सर्व ३३ जिल्ह्यांमध्ये अपंगार्थ विशेष रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रे कार्यरत होण्यासाठी आवश्यक ती पुढील सर्व कार्यवाही करण्याचे अधिकार आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवी मुंबई यांना देण्यात येत आहेत.

ड) अपंगार्थ विशेष रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र स्थापन केल्याबाबतची माहिती आकाशवाणी, दूरदर्शन व वृत्तपत्र या सारख्या प्रसार माध्यमातून प्रसिध्द करावी.

इ) वरीलप्रमाणे स्वतंत्र केंद्र स्थापन करण्यात आल्याबाबतचे सूचनाफलक प्रत्येक तालुक्याच्या ठिकाणी महत्वाच्या स्थळी लावण्यात यावेत.

३. आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवी मुंबई, सर्व विभागीय उप संचालक, रोजगार व स्वयंरोजगार विभागीय मुख्यालये व सर्व सहायक संचालक / जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी यांनी राज्याच्या ३३ जिल्ह्यांमध्ये नवीन अपंगार्थ विशेष रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रे कार्यरत करण्याबाबतच्या आदेशांची तात्काळ अंमलबजावणी करावी व त्यासंबंधीचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

ग.गो.पंचभाई

( ग. गो. पंचभाई )
शासनाचे सह सचिव

प्रत -
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मंत्री (रोजगार व स्वयंरोजगार) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (रोजगार व स्वयंरोजगार) यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई
सरकारी वकील, उच्च न्यायालय (औरंगाबाद खंडपीठ) औरंगाबाद.
आयुक्त, रोजगार व स्वयंरोगार संचालनालय,महाराष्ट्र राज्य, कोकण भवन,नवी मुंबई.
सर्व उपसंचालक,रोजगार व स्वयंरोजगार,सर्व विभागीय मुख्यालये.
सर्व सहाय्यक संचालक, रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रे.
सर्व जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी.
आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे.
सर्व मंत्रालयीन प्रशासनिक विभाग.
महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई.
सर्व विभागीय उप संचालक, माहिती व जनसंपर्क, विभागीय कार्यालये.
सर्व जिल्हा माहिती अधिकारी, माहिती व जनसंपर्क, जिल्हा कार्यालये.
सर्व अधिकारी, रोजगार व स्वयंरोजगार विभाग,मंत्रालय,मुंबई.
निवड नस्ती (रोस्वरो-१).